उपजिल्हा रुग्णालय वसमत जि.हिंगोली येथील इमारतीचे नुतनीकरण व दुरुस्ती कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** प्रशामा-२०२३/ प्र.क्र. १०५/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
दिनांक : २३ मे, २०२३.

**वाचा:- सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांकः आआसे/कक्ष-३/टे.६/ उजिरुवसमतदुरुस्तीवनुतनी/१६१८-१९ /२३, दि.२२.०२.२०२३.**

**प्रस्तावना:-**

उपजिल्हा रुग्णालय वसमत जि.हिंगोली येथील अस्तीत्वातील मुख्य इमारतीचे दुरुस्तीचे काम गेल्या अनेक वर्षापासून करण्यात आलेले नाही. सदर रुग्णालयाच्या काही भागातील आतील व बाहेरील प्लास्टर अतिशय जीर्ण झाले आहे. इमारतीचे छत देखिल पावसामुळे गळत आहे तसेच संपूर्ण रुग्णालय संरक्षण भिंतीसह कलरिंग करावे लागत आहे. प्रसाधनगृहाची दुरुस्ती व मधील अस्तित्वातील फर्शी दबल्यामुळे त्या ठिकाणी नविन फर्शी बसविणे व त्या भागाचे रिनोव्हेशन व इतर अनुषंगिक दुरुस्ती करणे अत्यंत आवश्यक असल्याने उपजिल्हा रुग्णालय वसमत जि.हिंगोली येथील इमारतीचे नुतनीकरण व दुरुस्ती कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता बांधकाम प्रस्तावास मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

उपजिल्हा रुग्णालय, वसमत जि.हिंगोली येथील इमारतीचे नुतनीकरण व दुरुस्ती कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता बांधकामास, रु. २००.८० लक्ष इतक्या अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे:-

**अटी व शर्ती :-**

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तु विशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.
५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
६) प्रस्तावित करण्यात आलेल्या इमारतीचे जोते क्षेत्रफळ अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करण्याच्या अटीस अधीन राहून अंदाजित रु. २००.८० लक्ष इतक्या किंमतीस सहमती दर्शविण्यात येत आहे.

३. सदर कामावरील खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय), ११०- रुग्णालये व दवाखाने, (१)-इमारती, (०१) (अ )

पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-इमारती (००) (०१) (४२१० ००१४), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९२१४४३०५११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.05.24 11:49:59 +05'30'

**( अशोक मा. आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य भवन, मुंबई.
३. संचालक,आरोग्य सेवा-२,पुणे
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ मंडळ औरंगाबाद , औरंगाबाद
८. जिल्हा शल्य चिकित्सक,हिंगोली
९. जिल्हा कोषागार अधिकारी,हिंगोली
१०. निवडनस्ती( आरोग्य-४ )